**मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) योजनेच्या तरतूदींमध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. मुरोनि-२०२४/ प्र.क्र.९८/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक २१/०५/२०२५

**वाचा**:-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मऔधो-२०१९/ प्र.क्र.६/ उद्योग-२, दि.०७/०३/२०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/ प्र.क्र.१२१/ उद्योग-७,दि. ०१/०८/२०१९ .
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.१७७/ उद्योग-७,दि. ३१/०८/२०१९.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. योजना-२०१९/ प्र.क्र.२३०/ उद्योग-७,दि.२३/०१/२०२०.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र. योजना-२०२०/प्र.क्र.१९८/ उद्योग-७, दि.०१/०२/२०२१.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुरोनिका/ शा.नि.सुधारणा/२०२४/अे-८७३, दि. ०८/१०/२०२४.
६) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली स्थापित उच्च स्तरीय सुकाणू समितीच्या दि. १०/०२/२०२५ रोजी संपन्न बैठकीचे इतिवृत्त.
७) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ मुरोनिका/ सुकाणू समिती बैठक/ २०२५/अे-२१७, दि. ०५/०३/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात उपलब्ध होत असलेल्या स्वयंरोजगाराच्या व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरूप वाव देणारी सर्वसमावेशक मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) ही योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. तसेच दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे सदर योजनेमध्ये सुधारणा करण्यात आलेल्या आहेत.

२. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्राच्या सर्व विभागात प्रभावीपणे व्हावी व योजनेअंतर्गत जास्तीत जास्त युवक-युवतीनी सहभाग घेऊन जास्तीत जास्त यशस्वी उद्योजक निर्माण होण्याच्या दृष्टीकोनातून योजनेच्या शासन निर्णयामध्ये कालानुरुप बदल करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने विकास आयुक्त(उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय सनियंत्रण समितीने सुचविलेल्या सुधारणांचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाकडून दिनांक ०८/१०/२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेला आहे. राज्यस्तरीय सनियंत्रण समितीच्या शिफारशीनुसार, उक्त शासन निर्णयाच्या तरतूदींमध्ये सुधारणा करणेबाबतचा प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सुकाणू समितीच्या दिनांक १०/०२/२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये निर्णयार्थ ठेवण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये उच्च स्तरीय सुकाणू समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेच्या दिनांक ०१/०८/२०१९ व दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सुकाणू समितीने केलेल्या शिफारशींनुसार, मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेबाबतच्या दिनांक ०१/०८/२०१९ व दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदींमध्ये पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे सुधारणा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>दिनांक ०१/०८/२०१९ व दिनांक ११/११/२०२२ च्या शासन निर्णयामधील तरतूद</th><th>सुधारीत तरतूद</th></tr>
<tr><td>१.</td><td>शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा “योजनेअंतर्गत पात्र घटक” :- कायदेशिररित्या पात्र असणारे उत्पादन, सेवा उद्योग, कृषी पूरक व्यवसाय, कृषीवर आधारीत उद्योग, ई-वाहतूक व त्यावर आधारीत व्यवसाय, एकाच नाममुद्रेवर (ब्रॅण्ड) आधारीत संघटित साखळी विक्री केंद्रे, फिरते विक्री केंद्र/ खाद्यान्न केंद्र इत्यादी घटक कार्यक्रमातंर्गत पात्र असतील. याविषयी गठीत राज्यस्तरीय संनियंत्रण समिती आवश्यकतेनुसार पात्र व अपात्र घटकांची यादी (Negative list) जाहीर करेल.</td><td>“योजनेअंतर्गत पात्र घटक” :- कायदेशिररित्या पात्र असणारे उत्पादन, सेवा उद्योग, कृषी पूरक व्यवसाय, कृषीवर आधारीत उद्योग, ई-वाहतूक व त्यावर आधारीत व्यवसाय, एकाच नाममुद्रेवर (ब्रॅण्ड) आधारीत संघटित साखळी विक्री केंद्रे, फिरते विक्री केंद्र/खाद्यान्न केंद्र तसेच कुक्कुट पालन, अंडी उबवणी केंद्र, मधुमक्षिकापालन, मत्स्यपालन, रेशीम उद्योग, हॉटेल/ ढाबा शाकाहारी/मांसाहारी पदार्थ विक्री व्यवसाय, होम-स्टे, क्लाऊड किचन, जलक्रीडा, मासेमारी, प्रवासी वाहतूकीकरीता बोट व्यवसाय योजनेतंर्गत पात्र असतील. या विषयी गठीत राज्यस्तरीय संनियंत्रण समिती आवश्यकतेनुसार पात्र व अपात्र घटकांची यादी (Negative list) जाहीर करेल.</td></tr>
<tr><td>२.</td><td>शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र. १(अ) “वयोमर्यादा” :-<br>कुठलेही स्थायी उत्पन्न नसलेले स्थानिक रहिवासी, ज्यांचे वय १८ वर्षे पूर्ण, अधिकतम मर्यादा ४५ वर्षे (अनुसूचित जाती/जमाती/ महिला/अपंग/माजी सैनिक यांच्यासाठी ५ वर्षे शिथिल) पात्र राहतील.</td><td>मुद्दा क्र. १(अ) “वयोमर्यादा” :-<br>कुठलेही स्थायी उत्पन्न नसलेले स्थानिक रहिवासी, ज्यांचे वय किमान १८ वर्ष पूर्ण झाले आहे.</td></tr>
<tr><td>३.</td><td>शासन निर्णय दिनांक ११/११/२०२२ मधील मुद्दा क्र.२ “प्रकल्प किंमत” :-<br>२.१) “मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमा” मध्ये पात्र उद्योग/ व्यवसायातंर्गत प्रकल्प किंमत कमाल मर्यादा सेवा उद्योग तसेच कृषी पुरक उद्योग/व्यवसायांसाठी रुपये २०.०० लाख व उत्पादन प्रकाराच्या प्रवर्गातील प्रकल्पासाठी प्रकल्प किंमत मर्यादा रुपये ५० लाख राहील.</td><td>मुद्दा क्र.२ “प्रकल्प किंमत” :-<br>२.१) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम मध्ये पात्र उद्योग/ व्यवसायातंर्गत प्रकल्प किंमत कमाल मर्यादा सेवा उद्योग तसेच कृषी पुरक उद्योग व्यवसायांसाठी रुपये ५० लाख व उत्पादन उद्योग प्रकल्पासाठी रुपये १०० लाख (१ कोटी) राहील. तथापि, मार्जिन मनी (देय अनुदान) कमाल मर्यादा खालील प्रमाणे राहील :-
<table>
<tr><th>घटकाचा प्रवर्ग/प्रभाग</th><th>उद्योगाचा प्रकार</th><th colspan="2">कमाल देय अनुदान</th></tr>
<tr><td>घटकाचा प्रवर्ग</td><td></td><td>शहरी</td><td>ग्रामीण</td></tr>
<tr><td rowspan="2">अनुसूचित जाती/ जमाती/महिला/अपंग /माजी सैनिक/इतर मागास प्रवर्ग/विमुक्त जाती व भटक्या जमाती/ अल्पसंख्याक</td><td>सेवा</td><td>२५% (कमाल रु. ५ लक्ष)</td><td>३५% (कमाल रु. ७ लक्ष)</td></tr>
<tr><td>उत्पादन</td><td>२५% (कमाल रु. १२.५ लक्ष)</td><td>३५% (कमाल रु. १७.५ लक्ष)</td></tr>
<tr><td rowspan="2">उर्वरीत प्रवर्ग</td><td>सेवा</td><td>१५% (कमाल रु. ३ लक्ष)</td><td>२५% (कमाल रु. ५ लक्ष)</td></tr>
<tr><td>उत्पादन</td><td>१५% (कमाल रु. ७.५ लक्ष)</td><td>२५% (कमाल रु. १२.५ लक्ष)</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>४.</td><td>शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र.२.२ “प्रकल्प खर्चाचे वर्गीकरण” :-<br>सेवा उद्योग व कृषी पूरक उपक्रमांसाठी व उत्पादन प्रकारातील उपक्रमांसाठी प्रकल्प किमतीअंतर्गत इमारत खर्च २०% च्या मर्यादेत असेल तसेच खेळते भांडवल प्रकल्प खर्चाच्या ३०% मर्यादेत असेल.</td><td>मुद्दा क्र.२.२ “प्रकल्प खर्चाचे वर्गीकरण” :-<br>सेवा उद्योग व कृषी पूरक उद्योगांसाठी खेळते भांडवलाची मर्यादा प्रकल्प खर्चाच्या ६०% व उत्पादन उद्योग प्रकल्पाकरीता प्रकल्पाच्या ४०% मर्यादेत असेल.</td></tr>
<tr><td>५.</td><td>शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र. ३.२.५ “प्रशिक्षण संस्था” :- "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाच्या"</td><td>मुद्दा क्र.३.२.५ “प्रशिक्षण संस्था” :- "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाच्या" उत्कृष्ट उपलब्धीसाठी कर्ज मंजूर झालेल्या उमेदवारांसाठी निवासी उद्योजकता प्रशिक्षण कार्यक्रम राज्यात</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| | उत्कृष्ट उपलब्धीसाठी कर्ज मंजूर झालेल्या उमेदवारांसाठी निवासी उद्योजकता प्रशिक्षण कार्यक्रम राज्यात उद्योजकता प्रशिक्षण कार्यक्रम देणा-या महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र, अथवा राज्यातील नामवंत संस्थाच्या सहयोगाने आयोजित करण्यात येईल. सदर प्रशिक्षण उत्पादन प्रवर्गातील उद्योग घटकांसाठी दोन आठवडे मुदतीचे व सेवा व कृषी पूरक उद्योगांसाठी १ आठवडे मुदतीचे असेल. | उद्योजकता प्रशिक्षण कार्यक्रम देणा-या महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र किंवा मिटकॉन अथवा राज्यातील नामवंत संस्थाच्या सहयोगाने आयोजित करण्यात येईल. सदर प्रशिक्षण उत्पादन उद्योगासाठी दोन आठवडे मुदतीचे व सेवा व कृषी पूरक उद्योगांसाठी १ आठवडे मुदतीचे असेल. तसेच शासनातर्फे देण्यात येणारे उद्योजकता प्रशिक्षण एका लाभार्थ्यास एकदाच भेटावे याकरीता कौशल्य विकास, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाअंतर्गत उद्योजकता प्रशिक्षणाचे प्रमाणपत्र धारण केलेल्या, मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेअंतर्गत कर्ज मंजूर झालेल्या लाभार्थ्यांना अनिवार्य निवासी/ऑनलाईन प्रशिक्षणातून सूट देण्यात येईल. |
| ६. | **शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र.५ "निवासी उद्योजकता प्रशिक्षण" :- "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाच्या" अंतर्गत** उत्कृष्ट उपलब्धीसाठी कर्ज मंजूर झालेल्या प्रकरणामध्ये लाभार्थीचे दोन आठवडे कालावधीचे निवासी उद्योजकीय प्रशिक्षण अनिवार्य असून यशस्वीरित्या प्रशिक्षण पूर्ण करणाऱ्या अर्जदारांनाच कर्ज वितरण व अनुदान सहाय्य वितरणासाठी पात्र ठरविण्यात येईल. | **मुद्दा क्र.५ "निवासी उद्योजकता प्रशिक्षण" :- "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाच्या" अंतर्गत** कर्ज मंजूर झालेल्या लाभार्थीस सेवा उद्योग व कृषी पूरक उद्योग/ व्यवसायासाठी एक आठवडा कालावधीचे व उत्पादन प्रवर्गातील प्रकल्पासाठी दोन आठवडे कालावधीचे निवासी अथवा ऑनलाईन उद्योजकीय प्रशिक्षण अनिवार्य असेल. यशस्वीरित्या प्रशिक्षण पूर्ण करणाऱ्या अर्जदारांनाच कर्ज वितरण व अनुदान सहाय्य वितरणासाठी पात्र ठरविण्यात येईल. लाभार्थ्यांना प्रशिक्षण पद्धतीची (ऑनलाईन /ऑफलाईन) निवड करण्याची तसेच प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण केंद्र निवडण्याची मुभा असेल. |
| ७. | **शासन निर्णय दिनांक ११/११/२०२२ मधील मुद्दा क्र.४ "वित्तीय संस्था(बँक)":-** "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम" अंतर्गत कर्ज प्रस्ताव जिल्हा कार्यबल समितीच्या मंजुरीने संबधित बँकाकडे कर्ज मंजुरीसाठी शिफारस करण्यात येतील. योजनेअंतर्गतच्या सहयोगी बँकांची यादी दिनांक ११/११/२०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद आहे. | **मुद्दा क्र.३ (३.२.१) "वित्तीय संस्था (बँक)":-** "मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम" अंतर्गत जिल्हा कार्यबल समितीच्या मान्यतेने कर्ज प्रस्ताव राष्ट्रीयकृत बँका तसेच योजनेअंतर्गत पात्र सहकारी/खाजगी क्षेत्रातील बँकाकडे शिफारस करण्यात येतील. दिनांक ११/११/२०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या योजनेअंतर्गतच्या सहयोगी बँकेच्या यादीमध्ये आता ए.यु.स्मॉल फायनान्स बँकेचा समावेश करण्यात येत आहे. |
| ८. | **शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र. ६ (६.१) (६.२) (६.३) "योजना अंमलबजावणी, समन्वय व संनियंत्रण" :-** (६.१) नुसार जिल्हास्तरीय आढावा व समन्वय समिती [District Level Review and Co-ordination Committee(DLRCC)], (६.२) नुसार जिल्हास्तरीय छाननी व समन्वय उप समिती [District Level Scrutiny and Co-ordination Sub-Committee (DLSCC)] व (६.३) नुसार जिल्हास्तरीय कार्यबल समिती [District Level Task Force Committee (DLTFC)] | **मुद्दा क्र.६ "योजना अंमलबजावणी, समन्वय व संनियंत्रण":-** (६.१) नुसार गठीत जिल्हास्तरीय आढावा व समन्वय समिती [District Level Review and Co-ordination Committee(DLRCC)] व (६.२) नुसार गठीत जिल्हास्तरीय छाननी व समन्वय उप समिती [District Level Scrutiny and Co-ordination Sub-Committee (DLSCC)] रद्द करून फक्त जिल्हास्तरीय कार्यबल समिती [District Level Task Force Committee (DLTFC)] कार्यरत राहील.<br>**जिल्हास्तरीय कार्यबल समितीची जबाबदारी खालीलप्रमाणे :-**<br>१. जिल्हास्तरीय सर्व यंत्रणांच्या समन्वयाने सुलभ अंमलबजावणी व उद्दिष्ट साधण्यासाठी आवश्यक कार्यवाही करणे.<br>२. जिल्हास्तरीय कार्यबल समितीत नव्याने एक (१) प्रमुख बँक प्रतिनिधी तसेच एक (१) प्रमुख औद्योगिक संघटना/ संस्था/ औद्योगिक सुमूहाचे प्रतिनिधी नियुक्त करणे.<br>३. कार्यक्रमाच्या उत्कृष्ट उपलब्धीसाठी वेळोवेळी आढावा घेऊन संबंधित यंत्रणांना आवश्यक सूचना देणे.<br>४. जिल्हास्तरीय बँकर्स समितीची बैठक आयोजित करून योजनेच्या प्रगती बाबतचा आढावा घेणे व आवश्यक उपाययोजना करणे. |
| ९. | **शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र.४ "अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत कार्यवाही" :-**<br>मार्जिन मनी रक्कम ही बँक शाखेद्वारा ३ वर्ष | **मुद्दा क्र.४ "अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत कार्यवाही" :-**<br>मार्जिन मनी रक्कम प्राप्त झाल्यानंतर संबंधीत बँकेकडून ती संबंधित कर्जखात्याच्या नावे मुदत ठेव करण्यात येईल. कर्जाच्या पहिल्या हप्त्याचे वितरण झाल्याच्या २ वर्षानंतर लाभार्थी प्रत्यक्ष भौतिक पडताळणी |

| | | |
|---|---|---|
| | कालावधीसाठी संबंधित कर्जखात्याच्या नावे डिपॉझिट करेल. ३ वर्ष कालावधी पूर्ण झाल्यानंतर जिल्हा समितीच्या मान्यतेने राज्य शासनाचे मार्जिन मनी अनुदान संबंधित कर्जखात्यावर जमा होईल. | प्रक्रियेस पात्र ठरतील व कर्जाच्या पहिल्या हप्त्याच्या वितरणास ३ वर्ष पूर्ण झाल्यानंतर जिल्हास्तरीय कार्यबल समितीच्या मान्यतेने मार्जिन मनी रकमेचे संबंधित कर्ज खात्यामध्ये समायोजन करण्यात येईल. |
| १०. | **शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र.१ क) "शैक्षणिक पात्रता" :-**<br>१. रु.१० लाखावरील प्रकल्पासाठी ७ वी उत्तीर्ण.<br>२. रु.२५ लाखावरील प्रकल्पासाठी १० वी उत्तीर्ण. | **मुद्दा क्र.१ क) "शैक्षणिक पात्रता" :-**<br>रु.१० लाखाच्या पुढील उत्पादन प्रवर्गातील प्रकल्पासाठी व रु.५ लाखाच्या पुढील सेवा व कृषी पूरक व्यवसाय/उद्योगाकरीता लाभार्थी किमान ८ वी उत्तीर्ण असणे आवश्यक राहील. |
| ११. | **शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील मुद्दा क्र. ३.१**<br>ग्रामीण भाग म्हणजे २०,००० लोकसंख्येच्या आतील क्षेत्र / गाव. | **मुद्दा क्र.३.१ ग्रामीण भागाची व्याख्या-**<br>पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेअंतर्गत ग्रामीण क्षेत्र म्हणून घोषीत करण्यात आलेल्या क्षेत्रास ग्रामीण भाग म्हणून ग्राह्य धरण्यात येईल. |

२. मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजना राबविण्यासंदर्भातील वरील तक्त्यामध्ये नमूद सुधारीत तरतूदी दिनांक ०१/०४/२०२५ पासून लागू राहतील.

३. उपरोक्त नमूद सुधारणांव्यतिरिक्त 'मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम' या योजनेच्या अनुषंगाने यापूर्वी निर्गमित शासन निर्णयांतील तरतूदी व कार्यप्रणाली पूर्वीप्रमाणेच राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२१११४२३०९८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.05.21 11:44:17 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सा.बां.वि.(साउ)) यांचे प्रधान सचिव
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, रा.उ.शु.) यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
६. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई.

९. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
१०. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
११. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व विभाग)
१३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग/औरंगाबाद विभाग/पुणे विभाग/नाशिक विभाग/अमरावती विभाग/नागपूर विभाग.
१४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
१७. सर्व जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
१८. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या नियंत्रणाखालील महामंडळे/शासकीय उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी. (उद्योग संचालनालयामार्फत)
१९. उद्योग सह संचालक/अधिक्षकीय उद्योग अधिकारी, मुंबई प्राधिकरण विभाग/कोकण विभाग/ पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर. (उद्योग संचालनालयामार्फत)
२०. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व) (उद्योग संचालनालयामार्फत)
२१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२३. अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई-३२.
२५. आदिवासी विकास विभाग (का-३), मंत्रालय, मुंबई-३२.
२६. अल्पसंख्यांक विकास विभाग (का-८), मंत्रालय, मुंबई-३२.
२७. वित्त विभाग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
२८. नियोजन विभाग (योजना-१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
२९. कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३०. निवड नस्ती (उद्योग-७), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.